**अनुसूचित जातीच्या मुलामुलींना शिक्षणासाठी परदेशी शिष्यवृत्ती योजना सन २०१७-१८ साठी विद्यार्थ्यांची निवड करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः इबीसी २०१७/प्र.क्र. ४०६/शिक्षण-१**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२

तारीख:-४ सप्टेंबर, २०१७

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सा. न्या. व वि.क्र.वि.स.इबीसी-२०१७/प्र.क्र.२८८/शिक्षण-१, दिनांक २७ जून, २०१७

२) शासन शुध्दीपत्रक, सा.न्या.व वि.स.वि.क्र.इबीसी-२०१७/प्र.क्र.२८८/शिक्षण-१, दिनांक १ जुलै, २०१७

३) शासन निर्णय, सा.न्या.व वि.स.वि.क्र.इबीसी-२०१७/प्र.क्र.४०६/शिक्षण-१, दिनांक १९ऑगस्ट,२०१७

**प्रस्तावना:-**

अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेशात नामांकित शिक्षण संस्थेत शिक्षणाची संधी मिळावी याकरीता सन २००३ पासून परदेशी शिष्यवृत्ती योजना लागू केली आहे. सदर योजनेच्या नियमावलीमध्ये कालानुरुप वेळोवेळी सुधारणा करण्यात आलेल्या असुन, संदर्भीय दिनांक २७ जून,२०१७ च्या शासन निर्णयान्वये या योजनेची सुधारीत नियमावली विहीत करण्यात आलेली आहे.

२. महाराष्ट्रातील अनुसूचित जातीचे विद्यार्थी पदव्युत्तर पदवी आणि पीएचडी अभ्यासक्रमासाठी ३०० क्यूएस वर्ल्ड रॅन्कींगच्या आतील परदेशातील शैक्षणिक संस्थेमध्ये प्रवेश घेतील, अशा एकूण ५० विद्यार्थ्यांची योजनेअंतर्गत निवड करण्यात येवून, त्यांना परदेश शिष्यवृत्ती मंजूर करण्यात येते. त्यानुसार सन २०१७-१८ या वर्षाकरीता परदेश शिष्यवृत्ती योजने अंतर्गत पात्र विद्यार्थ्यांची निवड करुन त्यांना परदेश शिष्यवृत्ती मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

३. परदेश शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत संदर्भीय दिनांक १९ऑगस्ट, २०१७ च्या शासन निर्णयान्वये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या निवड समितीने शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार निवड केलेल्या प्रपत्र -“अ”, “ब”, “क”, “ड” आणि “इ” मधील एकूण ३५ विद्यार्थ्यांना संबंधित परदेशातील विद्यापीठातील उच्च शिक्षणासाठी या शासन निर्णयान्वये शिष्यवृत्ती मंजूर करण्यात येत आहे.

४. परदेश शिष्यवृत्ती साठी निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांना अनुज्ञेय शिष्यवृत्ती प्रदान करण्यासाठी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी या शासन निर्णयान्वये परदेश शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांकडुन शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेली

हमीपत्रे घेवुन तसेच विद्यार्थ्यांची मुळ कागदपत्रांची तपासणी करुनच संबंधित विद्यार्थ्यास अनुज्ञेय शिष्यवृत्ती मंजूर करण्याची कार्यवाही करावी. तसेच संबंधित विद्यार्थ्यांना शासन निर्णयात नमूद अभ्यासक्रम व कालावधीसाठी शिष्यवृत्ती मंजूर करण्याचे तसेच विद्यार्थ्यांचे परदेशातील शिक्षण चालु असल्याच्या कालावधीत एखाद्या विद्यापीठाच्या शिक्षण शुल्कामध्ये वाढ किंवा घट होत असल्यास, त्यानुसार देय शिष्यवृत्ती मंजूर करण्याचे अधिकार आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांना प्रदान करण्यात येत आहेत.

५. ज्या विद्यार्थ्यांना शासनामार्फत परदेश शिष्यवृत्ती मंजूर केली आहे, त्या विद्यार्थ्यांनी त्यांचे शिक्षण संपल्यानंतर देशाची सेवा करणे व त्यांच्या ज्ञानाचा फायदा देशाला करुन देणे आवश्यक आहे. या अनुषंगाने संबंधित विद्यार्थ्यांकडून शिष्यवृत्ती मंजूर करण्यापूर्वी हमीपत्र (BOND) लिहून घेणे बंधनकारक राहील.

६. परदेश शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांने परदेशातील पद्व्युत्तर पदवी किंवा पीएचडी अभ्यासक्रम विहित कालावधीत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यासाठी कोणत्याही परिस्थितीत विद्यार्थ्यास मुदतवाढ वा वाढीव खर्च दिला जाणार नाही.

७. परदेश शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेल्या संबंधित विद्यार्थ्यास उच्च शिक्षण घेण्यासाठी ज्या शैक्षणिक संस्था, विद्यापीठात अथवा अभ्यासक्रमास मान्यता दिलेली आहे, ते ठिकाण वा अभ्यासक्रम विद्यार्थ्याने परस्पर बदलल्यास संबंधित विद्यार्थ्याकडुन शिष्यवृत्तीची रक्कम संपूर्णत: वसूल करण्यात येईल.

८. (अ) शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आलेल्या अभ्यासक्रमाच्या एकूण खर्चाच्या रकमेपैकी ज्या विद्यार्थ्यांना प्रथम वर्षाची अथवा ज्यांना द्वितीय वर्षाची शिष्यवृत्ती मंजूर झाली आहे, त्यांना त्या वर्षाचे शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च यांची रक्कम आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संबंधित विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती प्राप्त करुन घेऊन, शिक्षण फी संबंधित विद्यापीठास आणि निर्वाह भत्ता व अनुषंगिक खर्चाची रक्कम संबंधित विद्यार्थ्यांच्या बॅन्क खात्यात अदा करावी.

(ब) त्या नंतरच्या वर्षाचे सत्रनिहाय शिक्षण शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च याबाबत विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती, उपस्थिती आणि विद्यार्थ्याचा समाधानकारक शैक्षणिक प्रगती अहवाल प्राप्त करुन त्यानुसार आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी शासन निर्णयाप्रमाणे संबंधित वर्षाची अनुज्ञेय शिष्यवृत्तीची रक्कम वरील परिच्छेद ६ (अ) नुसार अदा करावी.

९. याबाबत होणारा खर्च हा "मागणी क्रमांक एन-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ - अनुसूचित जातीचे कल्याण, २७७, शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (वि.घ.यो.), (०४) (२३), विदेशात विशेष अध्ययन करण्यासाठी अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना राजर्षि शाहू महाराज शिष्यवृत्ती, (२२२५ ३८३ २), ३४ शिष्यवृत्त्या / विद्यावेतन" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून त्या अंतर्गत चालू आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. त्याकरीता आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

१०. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी परदेशी शिष्यवृत्ती मंजूर करताना शासन निर्णय क्रमांक इबीसी-२०१७ /प्र.क्र.२८८ /शिक्षण-१, दिनांक २७ जून, २०१७ व शासन शुध्दीपत्रक क्रमांक इबीसी-२०१७ /प्र.क्र.२८८ /शिक्षण-१, दिनांक १ जुलै, २०१७ मधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०९०११४०८११६४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=SJ And SA, ou=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fda96a8ca4dd3ecbdbbe4b156e5eaa93f60f3e037cbbbbdefe9e2961f45f0960, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2017.09.04 17:17:23 +05'30'

**( चंद्रकांत ह.वडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, मुंबई
७. संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई
८. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई.
९. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
१२. संबंधीत विद्यार्थी (समाजकल्याण आयुक्तालय, पुणे मार्फत).
१३. उपसचिव (अर्थसंकल्प)/(विघयो), सा.न्या.व वि.स.वि., मंत्रालय, मुंबई
१४. सहसचिव (शिक्षण-१), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. अवर सचिव (शिक्षण-१), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. शिक्षण -१ (निवडनस्ती)

(शासन निर्णय क्र.सा.न्या.व वि.स.वि.क्र.इबीसी-२०१७/प्र.क्र.४०६/शिक्षण-१,दिनांक ४ सप्टेंबर,२०१७चे सहपत्र)

# प्रपत्र-अ

## पदव्युत्तर पदवी - अभियांत्रिकी (PG Engineering)

### सन २०१७-१८ करीता अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेश शिष्यवृत्ती -निवड यादी

| अनु .क्र. | विद्यार्थ्याचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव | विद्या पीठाच्या देशाचे नाव | QS World Ranking 2017 | अभ्यास क्रम | परदेशातील विद्यापीठातील अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यास क्रम कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | अमेय संजय अंबाडे | Columbia University | USA | 20 | PG | MS Computer science | 18 Month |
| २ | सोनम शशिकांत अवचर | North-western University | USA | 26 | PG | Master of Science in information technology | 10 months |
| ३ | श्वेता भरत जवादे | The University of Manchester | UK | 29 | PG | Msc Management & information systems : Change and development | 1 year |
| ५ | दिक्षा महेश कुरणे | The University of Manchester | UK | 29 | PG | MSc Advanced Control and systems Engineering | 1 Year |
| ६ | प्रतिक निरंजन लोखंडे | University of Bristol | UK | 41 | PG | Nuclear Science and Engineering MSC | 1 Year |
| ७ | श्रीधर धुळाप्पा कांबळे | The University of Melbourne | Australia | 42 | PG | Master of Engineering Civil & Infrastructure | 3 Years |
| ८ | अजय भागवत सोनवणे | University of Melbourne | Australia | 42 | PG | Master of Engineering | 2 Years |
| ९ | विराग सुधिर वासनिक | The University of Sydney | Australia | 46 | PG | Master of Professional Engineering (Electrical) | 104 weeks |
| १० | उत्कर्षा दुधराम शहारे | University of New South Wales Sydney | Australia | 49 | PG | Master of Engineering Science | 2 Years |
| ११ | समीर दयानंद मेश्राम | University of Washington | USA | 59 | PG | Master of Science in Mechanical Engineering | 2 Years |
| १२ | पलाश शत्रुघ्न पाटोळे | Delfe University of Technology | Netherland | 62 | PG | MS in Aerospace Engg | 2 Years |
| १३ | अंकुर उत्तम कांबळे | University of Glasgow | UK | 63 | PG | MSc in Nano science and Nanotechnology | 1 Year |

| अनु .क्र. | विद्यार्थ्याचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव | विद्यापीठाच्या देशाचे नाव | QS World Ranking 2017 | अभ्यास क्रम | परदेशातील विद्यापीठातील अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यास क्रम कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १४ | सुशांत साताप्पा पोवार | Monash University | Australia | 65 | PG | Master of Advanced Mechanical Engineering | 2 years |
| १५ | सुमित रविंद्र कांबळे | University of Birmingham | UK | 82 | PG | Msc Advanced Engineering Management (Construction Management) | 1 Year |
| १६ | चैताली तिलोत्तम देवतळे | University of Birmingham | UK | 82 | PG | MS Communication Engg & Networks FT | 1 Year |
| १७ | गौरव झुंबर सोळसे | University of Birmingham | UK | 82 | PG | MSc Advanced Mechanical Engineering | 1 Year |
| १८ | उदयराज युवराज थोरात | The University of Sheffield | UK | 84 | PG | MSc in Advanced Mechanical Engineering | 1 Year |
| १९ | सुरज नागनाथ सुर्यवंशी | University of Southampton | UK | 87 | PG | MSc in Civil Engineering | 1 Year |
| २० | रोहित भिमराव जोंधळे | University of Southampton | UK | 87 | PG | MSc Biomedical Engineering | 1 Year |
| २१ | अंतरिक्ष दिनेश वाघमारे | Pennsylvania State University | USA | 95 | PG | Master of Science in information System | 2 Years |
| २२ | भूषण हरेश चव्हाण | Cardiff University | UK | 140 | PG | MSc Civil Engineering | 1 Year |
| २३ | सुहास प्रकाश देवमाने | Cardiff University | UK | 140 | PG | MSc in Advanced Mechanical Engineering | 1 Tear |
| २४ | प्रसाद बाबासाहेब रायमाने | Cardiff University | UK | 140 | PG | MSc in Advanced Mechanical Engineering | 1 Year |
| २५ | विनोद एकनाथ सातपुते | Cardiff University | UK | 140 | PG | MSc in Advanced Mechanical Engineering | 1 Year |
| २६ | ओंकार अदिनाथ चौधरी | Cardiff University | UK | 140 | PG | MSc in Advanced Mechanical Engineering | 1 Year |

## प्रपत्र-ब

### पदव्युत्तर पदवी - व्यवस्थापन (PG Management)

सन २०१७-१८ करीता अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेश शिष्यवृत्ती -निवड यादी

| अनु .क्र. | विद्यार्थ्यांचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव | विद्या पीठाच्या देशाचे नाव | **QS World Ranking 2017** | अभ्यास क्रम | परदेशातील विद्यापीठातील अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यास क्रम कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| २७ | राहुल सुरेश ओव्हाळ | Australian National University | Australia | 22 | PG | Master of Business Information Systems | 2 Years |
| २८ | प्रविण पोपटलाल मारुडा | Australian National University | Australia | 22 | PG | Master of Business Information Systems | 2 Years |
| २९ | निक्लेश सुरेद्र गोवंदे | Australian National University | Australia | 22 | PG | Master of Marketing Management (Advanced) | 2 years |
| ३० | विश्वास बाबुराव संगारे | Purdue University | USA | 92 | PG | Master of Business Administration | 2 Years |
| ३१ | पियुष मधुकर कांबळे | University of Technology Sydney | Australia | 193 | PG | Master of Management Extension | 2 Years |

## प्रपत्र-क

### पीएचडी - वाणिज्य (PhD COMMERCE)

सन २०१७-१८ करीता अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेश शिष्यवृत्ती -निवड यादी

| अनु .क्र. | विद्यार्थ्यांचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव | विद्यापीठाच्या देशाचे नाव | **QS World Ranking 2017** | अभ्यास क्रम | परदेशातील विद्यापीठातील अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यास क्रम कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ३२ | संदिप मोहन बडोले | Georgia Institute of Technology | USA | 71 | PhD | PhD Economics | 4 Years |

## प्रपत्र-ड

### पदव्युत्तर पीएचडी - अभियांत्रिकी (PhD Engineering)

सन २०१७-१८ करीता अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेश शिष्यवृत्ती -निवड यादी

| अनु .क्र. | विद्यार्थ्याचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव | विद्यापीठा च्या देशाचे नाव | **QS World Ranking 2017** | अभ्यास क्रम | परदेशातील विद्यापीठातील अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यास क्रम कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ३३ | सिदधार्थ सुरेश कांबळे | University of Bristol | UK | 41 | PhD | PhD Mechanical Engineering | 4 Years |

## प्रपत्र-इ

### पीएचडी - विज्ञान (PhD Science)

सन २०१७-१८ करीता अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेश शिष्यवृत्ती -निवड यादी

| अनु .क्र. | विद्यार्थ्याचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव | विद्यापीठा च्या देशाचे नाव | **QS World Ranking 2017** | अभ्यास क्रम | परदेशातील विद्यापीठातील अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यास क्रम कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ३४ | श्रुती राजकुमार बडोले | The University of Manchester | UK | 29 | PhD | PhD Astronomy and Astrophysics | 3 Years |
| ३५ | स्वप्निल सुधाकर इंगळे | Trinity College Dublin | Ireland | 98 | PhD | PhD Science Chemistry | 4 Years |